**विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, कोकण विभाग, नवी मुंबई यांच्या अधिनस्त जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे व उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे शहर या कार्यालयांच्या भाडे प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण-२०१९/प्र.क्र. १३४/२२-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय(वि),मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ जानेवारी, २०२०.

**संदर्भ** :- १) शासनाचे पत्र क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र. १८७/२२-स, दि. १८.१०.२०१६
२) सहकार आयुक्त व निबंधक, स. सं., महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. सर्वसा/१५सआ/जिउनि-ठाणे/भाडे प्रस्ताव/२०१९/४१७, दि. १७.१२.२०१९

**प्रस्तावना :-**

विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, कोकण विभाग, नवी मुंबई यांच्या अधिनस्त जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे व उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे शहर यांचे कार्यालय पूर्वी वर्धावत मेन्शन, चेंदणी क्रॅास रोड, ठाणे या इमारतीमध्ये कार्यरत होती. सदर इमारतीस ठाणे महानगरपालिकेने धोकादायक इमारत म्हणून दि. ०६.०१.२०१६ रोजी नोटीस दिली. त्यामुळे शासनाच्या संदर्भ क्र. १ अन्वये वरील दोन्ही कार्यालये दि. ०१.०३.२०१७ पासून ठाणे महानगरपालिकेच्या गावदेवी भाजी मंडई इमारत १ ला मजला, गोखले रोड, ठाणे (प) येथे स्थलांतरित करण्यात आलेले आहे. त्यानुसार ठाणे महानगरपालिकेच्या दि. २५.०४.२०१६ रोजीच्या सर्वसाधारण सभेतील ठरावात ३५५० चौ.फू. एवढ्या जागेचे रु. ४९.१६ प्र.चौ.फू. इतका दर महानगरपालिकेच्या स्वतंत्र मुल्यांकणानुसार दरमहा भाडे रुपये १,७४,५१६/- व वार्षिक भाड्यात दरवर्षी १० % भाडेवाढ याप्रमाणे ठराव पारित करण्यात आला होता. त्यास जिल्हाधिकारी, ठाणे यांनी मान्यता दिली. त्यानुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे क्र. १ यांनी दि. १०.१२.२०१९ च्या पत्रान्वये उक्त जागेचे क्षेत्रफळानुसार रु. ४९.१६ प्र.चौ.फू. इतका दर ठरवून पाच वर्षाच्या कालावधीसाठी वाजवी भाडे प्रमाणपत्र दिले.

२. सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे क्र. १ यांच्या वाजवी भाडे प्रमाणपत्र तसेच, दि. ०१.०३.२०१७ च्या भाडे करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार दि. ०१.०३.२०१७ ते दि. २८.०२.२०२२ या पाच वर्षाच्या कालावधासाठी प्रतिवर्ष १० % भाडेवाढ अधिक (+) जी.एस.टी. कर रहित भाडेवाढ जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे व उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे शहर या कार्यालयांचा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र. २ अन्वये सादर केलेल्या भाडेवाढ प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्याता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, कोकण विभाग, नवी मुंबई यांच्या अधिनस्त जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे व उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे शहर ही दोन्ही कार्यालये दि. ०१.०३.२०१७ पासून भाडेतत्वावर ठाणे महानगरपालिकेच्या गावदेवी भाजी मंडई ठाणे (प) येथे कार्यरत आहे. महानगरपालिकेच्या एकूण ३५५० चौ.फू. जागेच्या क्षेत्रफळाकरिता रु. ४९.१६ प्र. चौ. फू. या दराने दरमहा भाडे रु. १,७४,५१६/- व वार्षिक भाड्यात दरवर्षी १० % भाडेवाढ याप्रमाणे महानगरपालिकेने सर्वसाधारण सभेत ठराव पारित केला होता व त्यास जिल्हाधिकारी, ठाणे यांनी मान्यात दिली. त्यानुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे क्र. १ यांनी दि. १०.१२.२०१९ च्या पत्रान्वये दि. ०१.०३.२०१७ ते दि. २८.०२.२०२० या पाच वर्षाच्या कालावधीसाठी खालीलप्रमाणे वाजवी भाडे प्रमाणपत्र दिले आहे.

| अ.क्र. | दिनांकापासून ते दिनांकापर्यंत | प्रतिवर्षी १० % भाड्यात वाढ | मासिक भाडे |
|---|---|---|---|
| १ | ०१/०३/२०१७ ते २८/०२/२०१८ | - | १,७४,५१६/- |
| २ | ०१/०३/२०१८ ते २८/०२/२०१९ | १० | १,९१,९६८/- |
| ३ | ०१/०३/२०१९ ते २८/०२/२०२० | १० | २,११,१६५/- |
| ४ | ०१/०३/२०२० ते २८/०२/२०२१ | १० | २,३२,२८१/- |
| ५ | ०१/०३/२०२१ ते २८/०२/२०२२ | १० | २,५५५०९/- |

२. सार्वजनिक बांधकाम विभाग, ठाणे यांचे वाजवी भाडे प्रमाणपत्र तसेच, महानगरपालिकेच्या दि. ०१.०३.२०१७ च्या भाडे करारनाम्यतील अटी व शर्तीनुसार दि. ०१.०३.२०१७ ते दि. २८.०२.२०२२ या पाच वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिवर्ष १० % भाडेवाढ अधिक (+) जी.एस.टी. कर रहित भाडेवाढ याप्रमाणे उपरोक्त तक्त्यानुसार वाजवी भाड्याची गणणा करण्यात आली आहे. त्यानुसार जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे व उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे शहर या कार्यालयांचे वरील पाच वर्षाच्या कालावधीसाठी वरीलप्रमाणे भाडे ठाणे महानगरपालिका, ठाणे यांना अदा करण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता याद्वारे देण्यात येत आहे.

३. वरील कार्यालयाच्या भाड्याच्या रकमेचे एकत्रित देयक कोषागारात सादर करण्यासाठी '**नियंत्रक अधिकारी**' म्हणून जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे यांना तसेच, त्याच कार्यालयातील सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था, (२) ठाणे यांना '**आहरण व संवितरण अधिकारी**' म्हणून याद्वारे घोषित करण्यात येत आहे.

४. या वरील होणारा खर्च, मागणी क्र. व्ही-२, २४२५, सहकार,००१, संचालन व प्रशासन, (०१)(०५) विभागीय व जिल्हा प्रशासन, (अनिवार्य) १४-भाडेपट्टी व कर (२४२५००६७) या खाली प्रत्येक वर्षी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : विअप्र- २०१३/प्र.क्र.३०/१३, विनियम/भाग २ दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग-एक मधील अनु. क्र. १०, नियम क्र. ११५ आणि महाराष्ट्र आकस्मिक खर्च, १९६५ मधील नियम १४७ (क) खालील टिप-१, कार्यालयासाठी जागा भाड्याने घेण्यास व भाडे प्रदान करण्यास १ लक्षावरील रकमा मंजूर करण्यासाठी प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेवसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००१०८१२१००९२२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJU KALLUJI NARPANDE

Digitally signed by RAJU KALLUJI NARPANDE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=445c05397d3e5fac583c028b06de2a1fa2b53743e982f5c31c9f3ffb560b0c16, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f8faa195025519ecce143f48fe16b8572d279b7779146441b412b267fb25acd8, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJU KALLUJI NARPANDE
Date: 2020.01.08 11:52:14 +05'30'

**(राजू नरपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा.अध्यक्ष, विधान सभा/मा.सभापती, विधानपरिषद,विधान भवन,मुंबई.
४. मा.मंत्री (सहकार), यांचे खाजगी सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. मा.राज्यमंत्री (सहकार), यांचे खाजगी सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. सर्व विधान सभा सदस्य/विधान परिषद सदस्य
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई.
८. प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, मुंबई.
१०. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे,
११. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२. जिल्हाधिकारी, ठाणे,
१३. सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था,कोकण विभाग, नवी मुंबई,
१५. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे,
१६. उपनिबंधक, सहकारी संस्था, ठाणे शहर,
१७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. १- ठाणे
१८. महालेखापाल (ले व ह) महाराष्ट्र,१/२, मुंबई/ नागपूर,
१९. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र,१/२, मुंबई/ नागपूर,
२०. जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे,
२१. निवड नस्ती (२२-स)